**विभागीय वन अधिकारी (प्रादेशिक) चिपळून यांच्या कार्यालयामध्ये सहाय्यक वन संरक्षकाचे पद उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र.एमएफएस-२०२०/प्र.क्र.८१ /फ-८**
मादाम कामा मार्ग ,हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय,मुंबई-४०००३२.
दिनांक- २२ ऑक्टोंबर, २०२०

**संदर्भ:** - १. शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र.एमएफएस-२०१७/प्र.क्र.७७/फ-८ दि.१३/०९/२०१९.
२. मुख्य वनसंरक्षक (प्रादे.)कोल्हापूर यांचे पत्र क्र.कक्ष-५/आगि कात/चिप/सहा वन /१६७४ दि.१२/०३/२०२०.
३. प्रधान मुख्य वन संरक्षक (वन बल प्रमुख) नागपूर यांच्या कार्यालयाचे पत्र क्र.कक्ष-९/मवसे/ मुले/आकृतीबंध /प्र.क्र.७/१९-२०/४१९/१९-२० , दि.१३/०७/२०२०.

**प्रस्तावना :-**

मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दि.८/०७/२०१९ रोजी झालेल्या उच्चस्तरीय सचिव समितीच्या बैठकीमध्ये प्राप्त झालेल्या मंजुरी नुसार शासन निर्णय संदर्भ क्र.१ दि.१३/०९/२०१९ अन्वये वन विभागासाठी एकुण १९०३४ नियमित पदे + ४२९ अधिसंख्य पदे व ८३२९ वन मजूर (अधिसंख्य) असा एकुण २७७९२ पदांचा सुधारीत आकृतीबंध मंजूर करण्यात आला आहे. सदरहू शासन निर्णयान्वये सहाय्यक वन संरक्षकांची २७ पदे निरसित करण्यात आली असून २८९ पदे मंजूर करण्यात आली आहे. यास्तव पदांचे पुर्नगठण करण्याची कार्यवाही शासन स्तरावर सूरू आहे.

विभागीय वन अधिकारी (प्रादेशिक) चिपळुण हे त्या विभागाचे विभाग प्रमुख असून त्यांच्या अधिनस्त सहाय्यक वन संरक्षक संवर्गातील एकही पद मंजूर नसल्यामुळे त्यांच्या कार्यालयामध्ये भारतीय वन अधिनियम १९२७, महाराष्ट्र महसूल वन जमीन अधिनियम १९६६, भारतीय वन्यजीव संरक्षक अधिनियम,१९७२, महाराष्ट्र वन नियमावली, २०१४ इत्यादी कायद्यांची अमंलबजावणीमध्ये तांत्रिक व प्रशासकीय अडचणी उद्भवत आहेत. या शिवाय, विभागीय वन अधिकारी (प्रादेशिक) चिपळुण हे काही विभागीय चौकशी प्रकरणी सादरकर्ता अधिकारी असल्याने तसेच त्यांना विविध सभा,वनगुन्हे,न्यायालयीन प्रकरणात इत्यादी ठिकाणी स्वत: उपस्थित राहावे लागते.त्यामुळे त्यांना वनसंरक्षक व वन संर्वधन इत्यादी कामाकडे ज्यादाचे लक्ष केंद्रीत करण्यास मर्यादा येत आहेत. तसेच क्षेत्रीय/ कर्मचारी यांच्या कामाची तपासणी करण्यासाठी व कार्यालयीन कर्मचारी यांच्या कामकाजावर नियंत्रण ठेवण्यासाठी व कार्य आयोजनेनुसार कामाचे व्यवस्थापन करण्यासाठी मर्यादा निर्माण होत आहेत.

वरील वस्तुस्थिती विचारात घेऊन विभागीय वन अधिकारी (प्रादेशिक) चिपळुण यांच्या अधिनस्त सहाय्यक वन संरक्षकांचे एक पद उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

प्रधान मुख्य वन संरक्षक (वन बल प्रमुख) नागपूर यांनी प्रस्तावित केल्यानुसार, विभागीय वन अधिकारी (सामाजिक वनीकरण) रायगड यांच्या कार्यालयातील सहाय्यक वन संरक्षक - २ ,सामाजिक वनीकरण रायगड हे पद विभागीय वन अधिकारी (प्रादेशिक) चिपळुण यांच्या कार्यालयामध्ये वळती करण्यास व तद्नंतर या पदाचे पदनाम सहाय्यक वन संरक्षक (प्रादेशिक) चिपळून असे करण्यास शासन मान्यता प्रदान करत आहे.

| अ.क्र. | सध्याचे पदनाम | सुधारीत पदनाम | शेरा |
|---|---|---|---|
| १ | सहाय्यक वन संरक्षक - २ सामाजिक वनीकरण रायगड | सहाय्यक वन संरक्षक (प्रादेशिक) चिपळून | विभागीय वन अधिकारी सामाजिक वनीकरण,रायगड यांच्या कार्यालयातील सहाय्यक वन संरक्षक संवर्गातील दोन पदे मंजूर असून त्यातील सहाय्यक वन संरक्षक - २ सामाजिक वनीकरण रायगड हे पद विभागीय वन अधिकरी (प्रादेशिक) चिपळुन यांच्या अधिनस्त उपलब्ध करुन देण्यात येत आहे. |

सदर शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२०१०२२१४२७३३९८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil Niwrutti Dhas

Digitally signed by Anil Niwrutti Dhas
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=699d21cc89897191099434d443603426329c81b1b292ed2d168c892811118cc7, serialNumber=f85f1c64c05886c8d514e40d54d27ff3a80ffd907a05433b1c412b7f7ffa0afd, cn=Anil Niwrutti Dhas
Date: 2020.10.22 14:29:53 +05'30'

**( अनिल धस )**
कार्यासन अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य,नागपूर.
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), नागपूर.

३. अपर प्रधान मुख्य वन संरक्षक (प्रशासन - दुय्यम संवर्ग), नागपूर
४. मुख्य वनसंरक्षक (प्रा.), ठाणे / कोल्हापूर.
५. वन संरक्षक (सामाजिक वनिकरण) ठाणे.
६. विभागीय वन अधिकारी (सामाजिक वनीकरण) रायगड.
७. विभागीय वन अधिकारी (प्रादेशिक) चिपळून
८. महालेखापाल,महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र १,मुंबई.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, कोषागार कार्यालय, रायगड/ रत्नागिरी
१०.मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव
११.मा.राज्यमंत्री (वने) यांचे खाजगी सचिव
१२.प्रधान सचिव (वने) यांचे स्वीय सहाय्यक
१३.निवड नस्ती (फ-८ कार्यासन).